मोटार वाहन विभागातील सहायक मोटार वाहन निरीक्षक संवर्गातुन मोटार वाहन निरीक्षक पदावर पदोन्नती देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांक : एमव्हीडी-०६२४ /प्र.क्र.१२९/परि-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १९ जून, २०२५.

**शासन निर्णय :**

मोटार वाहन विभागातील खालील सहायक मोटार वाहन निरीक्षक वेतनश्रेणी एस-१४ : (३८६००-१२२८००) संवर्गातील अधिकाऱ्यांना या आदेशाच्या दिनांकापासून मोटार वाहन निरीक्षक वेतनश्रेणी एस १६: (४४९००-१४२४००) या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ६ मध्ये दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | प्रवर्ग | ज्येष्ठता क्रमांक | अनुज्ञेय महसूली विभाग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | श्री. अमित प्रेमराज काळे | अ.ज. | ०३ | कोकण २ (१) | प्रादेशिक परिवहन कार्यालय, पनवेल. |
| २. | श्री. प्रशांत बाळासाहेब शिंदे | अ.जा. | २३९ | -- | प्रादेशिक परिवहन कार्यालय, पुणे. |

२. सदरची तात्पुरती पदोन्नती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहेत:-

(अ) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार भरण्याबाबत साप्रवि/१६-ब यांनी दि. ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सुचनांनुसार मान्यता देण्यात येत आहे. सदर याचिकेवरील निर्णयान्वये पदोन्नतीचे आदेश बाधीत झाल्यास या आदेशान्वये पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यास सेवाज्येष्ठता व तद्नुषंगीक आर्थिक लाभ मागण्याचा हक्क राहणार नाही.

(ब) पदोन्नतीसाठी पात्र ठरलेल्या उपरोक्त अधिकाऱ्यास देण्यात येणारी पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपाची आहे. यास्तव या अधिकाऱ्यास नियमीतपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

(क) पदोन्नत अधिकाऱ्याने पदोन्नती नाकारल्यास शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/कार्या-१२, दि.१२.९.२०१६, एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्या-१२, दि.०१.०८.२०१९, मधील तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(ड) मोटार वाहन निरीक्षक पदावर तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी हे आदेश निघाल्याच्या तारखेपासून **तीस** दिवसांमध्ये मोटार वाहन निरीक्षक पदावर रुजू होणे आवश्यक आहे. पदोन्नत अधिकाऱ्यांस पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याने विहित मुदतीत कार्यमुक्त करावे.

३. सदरची पदोन्नती ही सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १४.०७.२०२१ रोजीच्या अधिसूचनेतील तरतुदीनुसार करण्यात आली आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१९१७४२४३२४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAGAR DHONDIRAM PATIL

Digitally signed by SAGAR DHONDIRAM PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b303a302c4285dac740589e585048fce69e2ef2ade0799db990bcdca3ead8311, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0255578456B2F5C05285C172A57976163858393ED219ED428FAD29A0BBE29DEE, cn=SAGAR DHONDIRAM PATIL
Date: 2025.06.19 17:44:01 +05'30'

**(सागर धों. पाटील)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्य मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.अपर मुख्य सचिव (परिवहन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षण), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. सह सचिव (परिवहन) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
१०. सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी.
११. सर्व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५. संबंधित अधिकारी (परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत).
१६. निवडनस्ती/परि-३.